**आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत**

**अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, ठाणे व अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग. कल्याण**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र.डीएलपी ०३११/९२३/प्र क्र १३४/पोल-३
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १ डिसेंबर, २०११

**वाचा :-**

१) गृह विभाग शासन निर्णय क्र. अेपीओ ३१०८/१८१/प्र क्र ४१/पोल-३ दिनांक १२ फेब्रुवारी, २००८.
२) अपर पोलीस आयुक्त (प्रशासन) ठाणे शहर यांचे क्रमांक ठाआ /पशा २(२४५) डी-१/२८४/२०११ दिनांक १६/०८/२०११

**शासन निर्णय:-**

पोलीस आयुक्त, ठाणे यांच्या कार्यालयाची पुनर्रचना झाल्यानंतर परिमंडळीय अपर पोलीस आयुक्त, यांना त्यांच्या विभागात कायदा व सुव्यवस्था तसेच वाढती गुन्हेगारी, खंडणी गँगवार अतिरेकी कारवाया इ. परिणामकारक नियंत्रण करता यावे तसेच पोलीस आयुक्त, कार्यालयातील संपूर्ण आस्थापनेवरील प्रशासकीय कामामध्ये सुसुत्रता आणण्यासाठी व कामकाज जलदगतीने व पारदर्शक होण्यासाठी त्याच प्रमाणे प्रशासन व लेखाविषयक कामामधील तफावती कमी करण्याच्या उद्देशाने अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, ठाणे व अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, कल्याण यांना संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये " प्रादेशिक कार्यालय प्रमुख " म्हणून घोषित करण्यात आले आहे. या प्रादेशिक कार्यालयाच्या अधिपत्याखाली असलेली विभागीय कार्यालये, पोलीस स्टेशन व इतर शाखा यांचे वेतन व भत्ते आणि इतर देयके प्रलंबित राहू नये तसेच सदर कामाचा जलद निपटारा होण्याच्या दृष्टीने "अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, ठाणे व अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, कल्याण " यांना **"आहरण व संवितरण अधिकारी "** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, ठाणे व अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, कल्याण यांनी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडून महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. १५ ( तिन) नुसार प्राधिकारपत्र प्राप्त करुन घेण्याची तसेच संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय यांच्याकडून संगणक सांकेतांक (DDO Code ) प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करावी.

**(कृ. मागे पहा.)**

३. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२०२०५४४४३००१ असा आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८, खंड-१ मधील नियम १५६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५०/११/कोषा-५ दिनांक २२/११/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नं. म. शिंदे)
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) पोलीस आयुक्त, ठाणे शहर
३) महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
४) जिल्हाधिकारी, ठाणे
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२ प्रती)
६) अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग,ठाणे
७) अपर पोलीस आयुक्त, पश्चिम प्रादेशिक विभाग, कल्याण
८) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
९) वित्त विभाग (व्यय-७)/अर्थसंकल्प-११/कोषा-५), मंत्रालय मुंबई-३२
१०) गृह विभाग पोल-१अ/ पोल-५(अ), मंत्रालय, मुंबई.३२
११) निवड नस्ती पोल-३, मंत्रालय, मुंबई-३२